**आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत वैरण बियाणांचे प्रापण, संकलन व वितरण आणि ठोंबे वाटप या योजनेसाठी निधी वितरीत करणेबाबत.**
**केंद्र हिस्सा लेखाशिर्ष (२४०३ डी ८३८)**
**राज्य हिस्सा लेखाशिर्ष (२४०३ डी ८४७)**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२१ /प्र.क्र.०७ / कार्यासन ६**
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: २४ डिसेंबर, २०२१.

**वाचा :-**

१) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.२४.०६.२०२१ व दि.१४.१०.२०२१.
२) कृषि व पदुम विभागाची नस्ती क्र. बीडीएस-२०२१/प्र.क्र.१६४/पदुम-४.

**प्रस्तावना -:**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत कृषि व पदुम विभागामार्फत अंमलबजावणी करण्यात येणाऱ्या केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय पशुधन अभियानाच्या वैरण व पशुखाद्य या उप अभियानांतर्गत वैरण बियाणांचे प्रापण, संकलन व वितरण आणि ठोंबे वाटप या योजनेंतर्गत अनुसूचित जमाती घटकासाठी सन २०२०-२१ मधील अखर्चित असलेला केंद्र हिस्सा रु.२.२७०४४ लाख व समरुप राज्य हिस्सा रु.१.५१२०२ लाख असा एकूण रु.३.७८२४६ लाख इतका निधी वितरीत करण्याबाबत पदुम विभागाकडून संदर्भाधीन क्र.२ अन्वये सादर करण्यात आलेल्या प्रस्तावास अनुसरुन निधी वितरणाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रम अंतर्गत मागणी क्र.टी-५ मधील २४०३-पशुसंवर्धन या मुख्य लेखाशीर्षाखाली केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय पशुधन अभियानाच्या वैरण व पशुखाद्य या उप अभियानांतर्गत वैरण बियाणांचे प्रापण, संकलन व वितरण आणि ठोंबे वाटप योजनेंतर्गत सन २०२०-२१ मधील अखर्चित असलेला केंद्र हिस्सा रु.२.२७०४४ लाख व समरुप राज्य हिस्सा रु.१.५१२०२ लाख असा एकूण रु.३.७८२४६ लाख इतक्या निधी वितरण प्रस्तावावर वित्त विभागाने निधी उपलब्ध करुन दिल्यानुसार सन २०२१-२२ च्या आर्थिक वर्षाच्या उपलब्ध तरतुदींतून पुढीलप्रमाणे निधी वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे :-

**(रु. लाखात)**

| योजनेचे नाव | लेखाशीर्ष व केंद्र / राज्य हिस्सा | बाब | सन २०२१-२२ मधील अर्थसंकल्पीत तरतूद | सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येत असलेली तरतूद |
|---|---|---|---|---|
| वैरण बियाणांचे प्रापण, संकलन व वितरण आणि ठोंबे वाटप | २४०३ डी ८३८ (केंद्र हिस्सा ६० टक्के) | ३३, अर्थसहाय्य | ४५.०० | २.२७०४४ |
| | २४०३ डी ८४७ (राज्य हिस्सा ४० टक्के) | | ३०.०० | १.५१२०२ |
| | **एकूण** | | **७५.००** | **३.७८२४६** |

२. उपरोक्त प्रमाणे **एकूण रु.३.७८२४६ लाख (अक्षरी रुपये तीन लाख अठ्ठयाहत्तर हजार दोनशे सेहेचाळीस फक्त)** इतका निधी प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून प्रधान सचिव (पदुम), कृषि व पदुम विभाग यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर (BEAMS) वितरीत व खर्च करण्यास याद्वारे शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर तरतुद खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.१६.०४.२०२१ व दि.१४.१०.२०२१ च्या शासन निर्णयातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करण्याची जबाबदारी संबंधित प्रशासकीय विभागाची राहील.

४. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, आदिवासी उपयोजना बाह्य क्षेत्रात केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी. त्या अनुषंगाने झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्टाबाबतची माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ. माहिती आदिवासी विकास विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवावी.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या वाचा क्र.१ अन्वये विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये व वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.१०६६/व्यय-१४, दि.०९.१२.२०२१ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११२२०१२०६३८७२२४ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAVINDRA D AUTE

Digitally signed by RAVINDRA D AUTE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f05a6913f9dee1f453c9a1c5a89d8c4897737ba8e4ac0edf3f2c6e69e25f4108, pseudonym=C4ECFFC229308BD3BD1E334FAC78848FBF7F7613, serialNumber=CA98EFAC317508AB9B5820B47955BC1BABB173F20D25ABD816ED91A9B6B0F16C, cn=RAVINDRA D AUTE
Date: 2021.12.24 14:19:54 +05'30'

**( रविंद्र दि. औटे )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा. राज्यमंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. प्रधान सचिव ( पदुम ) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. आयुक्त (पशुसंवर्धन), महाराष्ट्र राज्य, पुणे.
५. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
६. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक / नागपूर / ठाणे / अमरावती.
७. वित्त विभाग ( अर्थसंकल्प- १९/ व्यय १४ ), मंत्रालय, मुंबई.
८. कृषि व पदुम विभाग मंत्रालय, मुंबई.
९. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा मजला, विधानभवन, मुंबई.
१०. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
११. कार्यासन क्र. २ व ९, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
१२. निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग.